**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग ( खुद्द) व प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये यांचे करीता खरेदी प्रक्रिया राबविण्यासाठी रु. ५.०० कोटी वरील खरेदी संदर्भातील सर्व प्रकरणे उच्च स्तरीय समितीपुढे सादर करण्यांसाठी उच्च स्तरीय समिती स्थापन करण्यांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०२०/प्र.क्र ७२/व्यशि -५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २२.०६.२०२०.

<u>वाचा :</u>- १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक:भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ३०.१०.२०१५.

२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-१११११/प्र.क्र.१६६/१९/व्यशि-५, दिनांक १३.११.२०१९.

३) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१९/प्र.क्र २४३/ प्रशा -१, दिनांक १९.११.२०१९.

**<u>प्रस्तावना:-</u>**

उद्योग, उर्जा व कामगार विभागाने दिनांक ३०.१०.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका निर्गमित केली आहे. सदर नियमपुस्तिकेतील प्रकरण क्रमांक २ मधील मुद्दा क्रमांक २.९ मध्ये विविध समित्यांची रचना व अधिकार नमूद करण्यांत आलेले आहेत.

कौशल्य विकास व उद्योजकता विभाग ( खुद्द) व प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ व महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी व विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये यांचे करीता खरेदी प्रक्रिया राबविण्यासाठी विभागाचे अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय खरेदी समिती विभागाच्या शासन निर्णय दिनांक १९.११.२०१९ अन्वये गठीत करण्यांत आलेली आहे.

विभागांतर्गत राबविण्यांत येणा-या सर्व योजना/प्रकल्प व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ अन्वये पुन: प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारातील रुपये पाच लाख किंमतीच्या वरील खरेदी संदर्भातील सर्व प्रकरणे राज्यस्तरीय खरेदी समितीसमोर आणणे बंधनकारक राहील, असे विभागाच्या दिनांक १९.११.२०१९ च्या शासन निर्णयात नमूद केलेले आहे.

विभागाकडून वस्तुंच्या खरेदीसाठी खुप मोठी रक्कम खर्ची पडत असल्याने खरेदी प्रक्रियेत कोणतीही अनियमितता होऊ नये तसेच या संदर्भात कोणतेही आरोप-प्रत्यारोप होऊ नयेत याकरीता खरेदीमध्ये जास्तीत जास्त पारदर्शकता आणणे आवश्यक आहे. तसेच, विभागाच्या दिनांक १९.११.२०१९ च्या शासन निर्णयात खरेदीबाबतची कोणतीही कमाल मर्यादा नमूद केलेली नाही. सदर बाब विचारात घेऊन कौशल्य विकास व उद्योजकता विभाग ( खुद्द) व प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ व महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी व विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये यांचे करीता खरेदी प्रक्रिया राबविण्यासाठी रु.५.०० कोटी वरील खरेदी संदर्भातील सर्व प्रकरणांकरीता उच्च स्तरीय समिती गठीत करण्यांचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

कौशल्य विकास व उद्योजकता विभाग ( खुद्द) व प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ व महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी व विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये यांचे करीता खरेदी प्रक्रिया राबविण्यासाठी रु.५.०० कोटी वरील खरेदी संदर्भातील सर्व प्रकरणांकरीता उच्च स्तरीय समिती पुढील प्रमाणे गठीत करण्यांत येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग | सदस्य सचिव |
| ३ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| ५ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, उद्योग विभाग | सदस्य |
| ६ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, शालेय शिक्षण विभाग | सदस्य |
| ७ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,उच्च व तंत्रशिक्षण विभाग | सदस्य |
| ८ | प्रधान सचिव / सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग | सदस्य |

केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाकडून गव्हर्नमेंट ई - मार्केटप्लेस ( GeM) कार्यपध्दतीच्या बाबत भविष्यात ज्या ज्या सुधारणा करण्यांत येतील त्यांचा आढावा उपरोक्त मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील गठीत उच्चास्तरीय समिती वेळोवेळी घेईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या wwww.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००६२३१०३७४५०४०३ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: CN = Santosh Vithal Rokade, C = IN, S = Maharashtra, O = Skill Development and Entrepreneurship Department, Government Of Maharashtra, OU = eOffice
Date: 2020.06.23 13:06:07 +05'30'

**( संतोष रोकडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर
४. विकास आयुक्त ( उद्योग ), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई ३२.
५. आयुक्त, कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई.
६. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई ४०० ००१.
७. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, मुंबई ४०० ०५१.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई ४०० ००५.
९. व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ, जे.जे. स्कुलच्या पाठीमागे, मुंबई.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई ४०० ०३२.
११. महाराष्ट्र राज्य व्यवसाय प्रशिक्षण समिती, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. प्रधान सचिव / सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. अपर मुख्य सचिव, कौशल्य विकास उद्योजकता विभाग यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१९. सह सचिव / उप सचिव , कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -३२.
२०. कौशल्य विकास व उद्योजकता विभागातील सर्व कार्यासने
२१. निवड नस्ती ( व्यशि -५ )